**<u>पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी येथील रवींद्र नाट्य मंदिराच्या ५, ६ व ७ व्या मजल्यावरील अपूर्ण बांधकाम पी.पी.पी. द्वारे पूर्ण करण्यासाठी कन्सल्टंट एजन्सी नियुक्त करुन तीचे शुल्क अदा करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करणेबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पुलदे-२०१८/प्र.क्र.२३/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ जानेवारी, २०१९

<u>वाचा :</u>- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.२८.०३.२०१८.
२) प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांची क्र. पुलदे/४९२१, दि.२३.१.२०१८, क्र.पुलदे/४९२७, दि.२५.०१.२०१८, क्र.पुलदे/४८८३, दि.२५.१०.२०१७, क्र. आस्थापना/२०१७/११५, दि. ८.५.२०१८, क्र. पुलदे/३२४, दि. ०७.०७.२०१८, क्र. पुलदे-५८८, दि.१५.१०.२०१८, क्र. ८२१, दि. १०.१२.२०१८ व क्र.पुलदे/९१४/दि. ०९.०१.२०१९.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.पीपीपी/२०१४/प्र.क्र.१९/एसपी, दि.१७.०९.२०१४.
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुलदे-२०१८/प्र.क्र.२३/ सां.का.२, दि.२८.०३.२०१८.

**<u>शासन निर्णय:-</u>**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी येथील रवींद्र नाट्य मंदीराच्या ५, ६ व्या मजल्यासाठी प्रायोगिक रंगभूमी सभागृह व ७ व्या मजल्यासाठी बहुउद्देशीय सभागृहाचे अपूर्ण बांधकाम पूर्ण करण्यासाठी शासनाने मंजूरी दिलेली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.१७.९.२०१४ रोजीच्या शासन निर्णय अन्वये खाजगी सार्वजनिक भागीदारी (PPP) अंतर्गत काम करण्यासाठी या कामाची गरज विचारात घेवून आर्थिक अभियांत्रिकी (Financial Engineering) व व्यवहार सल्ला (Transaction Advisory) सेवांकरिता शासन स्तरावर खाजगी सल्लागाराचे पॅनल गठीत केले असून सदर पॅनलकडून कामाचे तांत्रिक व आर्थिक बाबींसाठी सल्ला/ मार्गदर्शन घेण्यात येते. सदर पॅनलवरील संस्थांपैकी Tandon Urban Solutions Pvt. Ltd. (TUSPL) या संस्थेने या कामासाठी तयारी दाखविली आहे. त्यासाठी रु.१४,५७,९९७-/ + GST (अक्षरी रूपये चौदा लाख सत्तावण्ण हजार नऊशे सत्याण्णव फक्त ) इतकी रक्कम त्या संस्थेस अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता या आदेशाव्दारे देण्यात येत आहे.

यावरील होणारा खर्च "मागणी क्र. झेडडी-२,२२०५ कला व संस्कृती (००) (१०१) ललित कला शिक्षण (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई (२२०५ १४६३) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येऊन सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतूदीमधून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्तीय नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला,उप-विभाग-तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रं. २७ (२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९०११११७२२१६४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2019.01.14 15:39:55 +05'30'

**( बाळासाहेब सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे विशेष कार्य अधिकारी, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) मा. विधानसभा सदस्य यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (सां.का.), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक.
८) उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट कला अकादमी, मुंबई.
१०) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
११) महालेखापाल,(लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) निवड नस्ती, सां.का.२.